**कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकाकरिता (कापूस, ऊस) सन २०१८-१९ चा अखर्चित ₹४१.७८ लाख निधी पुनर्जिवित करून सन २०१९-२० मध्ये अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी विनियोगात आणण्यास मान्यता प्रदान करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राअसुअ-१२१९/प्र.क्र.६३/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २५ नोव्हेंबर, २०१९

**संदर्भ:-**

१. कृषी व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि. १९/०४/२०१७.
२. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३ दि. ०१/०४/२०१९.
३. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०१५ -CU-IV दि. ०९/०४/२०१९.
४. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/विप्र३/राअसुअऊस/योजना/१७२/२०१९, दि.११/०४/२०१९.
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. अेअपी-२०१९/प्र.क्र.२२/४-अे, दि.०३/०६/२०१९.
६. कृषि, सहकार व शेतकरी कल्याण विभाग, कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. No.२-९/२०१५ -CU-IV दि. १८/०७/२०१९
७. कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/विप्र३/राअसुकापूस/१९-२०/३०५/२०१९, दि.२०/०७/२०१९
८. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राअसुअ-१०१९/प्र.क्र.५७ /४-अे, दि.०६/०८/२०१९
९. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र.बीयुडी-२०१९/प्र.क्र.७/कार्यासन-६, दि.०८/११/२०१९

**प्रस्तावना:-**

सन २०१९-२० करिता केंद्र शासनाने राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता (कापूस, ऊस) संदर्भ क्र.३ येथील दि.०९/०४/२०१९ च्या पत्रान्वये ₹८७२.५८ लाख रकमेचा कृती आराखडा मंजूर केला असून त्यानुसार ₹८७२.५८ लाख (केंद्र हिस्सा रु.५२३.५५ लाख + राज्य हिस्सा रु.३४९.०३ लाख) रकमेच्या कृती आराखडयास संदर्भ क्र.५ येथील दि.०३ जून २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.६ येथील दि. १८ जुलै, २०१९ च्या पत्रान्वये अंतरिम उपयोगीता प्रमाणपत्राच्या आधारे सन २०१८-१९ अखर्चित असलेला केंद्र हिश्श्याचा एकूण ₹१९१.८६ लाख निधी पुनर्जिवित करुन सन २०१९-२० मध्ये विनियोगात आणण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर अखर्चित निधीपैकी अनुसूचित

जमाती प्रवर्गासाठी कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र.७ येथील दि.२०/०७/२०१९ च्या पत्रान्वये केलेल्या मागणीप्रमाणे केंद्र व राज्य हिश्श्याचा आवश्यक निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णयः**

१. २०१८-१९ करीता कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिकांकरीता **(कापूस, ऊस) अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी** प्राप्त निधीपैकी अखर्चित असलेला **केंद्र व राज्य हिश्श्याचा एकूण रुपये ४१.७८ (अक्षरी रुपये एकेचाळीस लाख अठ्ठयात्तर हजार फक्त) निधी** पुनर्जिवित करुन सन २०१९-२० मध्ये सदर अभियानांतर्गत कापूस व ऊस पिकाकरिता सर्वसाधारण अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी विनियोगात आणण्यास खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **प्रवर्ग** | **राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत वाणिज्यिक पिके** | **केंद्र हिस्सा (६०%)** | **राज्य हिस्सा (४०%)** | **एकूण अखर्चित निधी** |
|---|---|---|---|---|---|
| १ | अनुसूचित जमाती | कापूस | ६.११ | ४.०७ | १०.१८ |
| | | ऊस | १८.९६ | १२.६४ | ३१.६० |
| | | | | **एकूण** | **४१.७८** |

२. परिच्छेद-१ मध्ये नमूद केल्यानुसार **कापूस या पिकाकरिता** केंद्र हिश्श्याचा ₹६.११ लक्ष निधी (अक्षरी रुपये सहा लाख अकरा हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याच्या ₹४.०७ लक्ष निधी (अक्षरी रुपये चार लाख सात हजार फक्त ) असा **एकूण ₹१०.१८ लक्ष निधी (अक्षरी रुपये दहा लाख अठरा हजार फक्त)** वितरीत करण्यात येत आहे.

३. परिच्छेद-१ मध्ये नमूद केल्यानुसार **ऊस या पिकाकरिता** केंद्र हिश्श्याचा **₹१८.९६** लक्ष निधी (अक्षरी रुपये अठरा लाख शहाण्णव हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याच्या ₹१२.६४ लक्ष निधी (अक्षरी रुपये बारा लाख चौसष्ट हजार फक्त ) असा **एकूण ₹३१.६० लक्ष निधी (अक्षरी रुपये एकतीस लाख साठ हजार फक्त)** वितरीत करण्यात येत आहे.

४. परिच्छेद-१ ते ३ मध्ये नमूद केल्यानुसार, कापूस, ऊस पिकाकरिता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत केलेला निधी सन २०१९-२० मध्ये पुढील लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:

| केंद्र/राज्य हिस्सा | **लेखशिर्ष**<br>**अनुसूचित जमाती प्रवर्ग** | |
|---|---|---|
| | **कापूस** | **ऊस** |
| **केंद्र हिस्सा** | **मागणी क्रमांक टी-५**<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२३) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- वाणिज्यिक पिके-कापूस (केंद्र हिस्सा ६०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A५७५)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक टी-५**<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२५) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- वाणिज्यिक पिके-ऊस (केंद्र हिस्सा ६०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A५९३)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |
| **राज्य हिस्सा** | **मागणी क्रमांक टी-५**<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२४) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- वाणिज्यिक पिके-कापूस (राज्य हिस्सा ४०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A५८४)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक टी-५**<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२६) कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- वाणिज्यिक पिके-ऊस (राज्य हिस्सा ४०%)<br>(केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१A६०१)<br>(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |

५. सन २०१९-२० मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

६. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानांतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्याच्या **₹४१.७८ लाख** रक्कमेचे जिल्हा निहाय/

कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून अभियानांतर्गत वितरीत निधी PFMS प्रणालीद्वारे खर्ची टाकावा.

७. सदर निधी खर्च करताना संदर्भाधीन अ. क्र.५ येथील दि०३ जून, २०१९ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३१/२०१९/व्यय-१, दि.०९/०९/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९११२५१५३४१७८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23cb110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA ROAD,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb71084bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
Date: 2019.11.26 15:34:05 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई.
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
८. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी,
१०. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
११. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
१२. सर्व कृषी विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४. सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद
१५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१६. सह संचालक लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१८. महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा ), प्रतिष्ठा भवन ,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१९. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
२०. वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३), मंत्रालय, मुंबई - ३२
२१. निवडनस्ती (कार्यासन-४अे).